संगणक संकेतांक २०१०१०२०१७३४३५००१



# महाराष्ट्र शासन

शासन निर्णय क्र.बीटीएच-२००२/(५०७८)/उद्योग-२
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दि. ७ जून, २००२

**प्रस्तावना :** महाराष्ट्राने जैव तंत्रज्ञान धोरण नुकतेच जाहीर केले आहे व धोरणाची अंमलबजावणी करण्यास सुरुवात झाली आहे. राज्यात जैव तंत्रज्ञान उद्योगांचा, उपक्रमांचा विकास होण्याच्या दृष्टीने उद्दीष्टे निश्चित करण्यात आली आहेत. यात प्रामुख्याने राज्यातील शेतकऱ्यांना प्रचलित हवामानात सुयोग्य, अधिक उत्पन्न देणारी तसेच अवर्षण व किड प्रतिबंधक पिके उपलब्ध करून देणे, रोगांचा मुकाबला करण्यासाठी किफायतशीर औषधी व साधने यांचा विकास करणे व रोगांचे प्राबल्य कमी करणे, जैविक पध्दतीने पशुधन विकास करणे तसेच सागरी संपत्ती सुधारणे व मत्स्यव्यवसायातील उत्पादकता वाढविणे, औषधी वनस्पती व पारंपारीक औषध उपचार पध्दतींचे मुल्य व उपयुक्तता वाढविणे, खाद्य व चारा उपयुक्तता वाढविणे व प्रक्रीया करणे, चांगले आरोग्य आणि चांगल्या पर्यावरणाच्या माध्यमातुन जीवनात गुणात्मक सुधारणा करणे या बाबींचा समावेश आहे.

महाराष्ट्र हे जैव तंत्रज्ञानातील आघाडीचे राज्य होण्याचे उद्दीष्ट साकार करण्यासाठी धोरणाची व्यापक अंमलबजावणीसाठी शासन प्रयत्नशील आहे. सदर प्रयोजनासाठी महाराष्ट्र जैव तंत्रज्ञान मंडळ स्थापन करण्याची बाब राज्य शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :** महाराष्ट्राचे जैव तंत्रज्ञान धोरण, २००१ ची व्यापक अंमलबजावणी करण्यासाठी व धोरणांतर्गत महात्वाकांक्षी ध्येय साध्य करण्यासाठी महाराष्ट्र जैव तंत्रज्ञान मंडळाची स्थापना करण्यात येत आहे. या मंडळाची संरचना पुढील प्रमाणे राहील -

| | | |
|---|---|---|
| १. | मुख्यमंत्री | अध्यक्ष |
| २. | मंत्री (उद्योग) | सदस्य |
| ३. | मंत्री (कृषी) | -"- |
| ४. | मंत्री (पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विकास) | -"- |
| ५. | मंत्री (सार्वजनिक आरोग्य, कुटुंब कल्याण व वैद्यकीय शिक्षण) | -"- |
| ६. | राज्य मंत्री (उद्योग) | -"- |
| ७. | डॉ. रघुनाथ माशेलकर, महासंचालक, वैज्ञानिक आणि औद्योगिक संशोधन परिषद, पुणे व सचिव, वैज्ञानिक आणि औद्योगिक संशोधन विकास, भारत सरकार | -"- |
| ८. | मुख्य सचिव | -"- |
| ९. | कुलगुरु, पंजाबराव कृषी विद्यापीठ, आकोला | -"- |
| १०. | कुलगुरु, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषी विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी | -"- |

११. कुलगुरु, मराठवाडा कृषी विद्यापीठ, परभणी -"-
१२. कुलगुरु, पुणे विद्यापीठ, पुणे -"-
१३. डॉ (श्रीमती) स्वाती पिरामल, निकोलस पिरामल (इंडिया) लि., मुंबई -"-
१४. श्री. ए.बी.जैन, संचालक, जैन उद्योग समुह, जळगांव -"-
१५. श्रीमती उषा जिअर, संचालक, जैव तंत्रज्ञान (महिको), धनलवाडी, जालना -"-
१६. सचिव (उद्योग) -"-
१७. सचिव (कृषी) -"-
१८. सचिव (वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये) -"-
१९. आयुक्त (अन्न व औषधे प्रशासन) -"-
२०. श्री.ए.टी.कुसरे, महाव्यवस्थापक, आय.सी.आय.सी.आय., मुंबई. -"-
२१. विकास आयुक्त (उद्योग) सदस्य सचिव

जैव तंत्रज्ञान क्रांतीचा सामाजिक व आर्थिक लाभ राज्यातील प्रत्येक नागरिकास मिळेल या दृष्टीने सदर मंडळाने धोरणाची वेळेवर व योग्य अंमलबजावणी होण्याबाबत दक्षता घ्यावी. राज्यातील जैव तंत्रज्ञान उद्योग स्पर्धेत आपले स्थान नेहमीच टिकवून ठेवण्याच्या दृष्टीने मंडळाने प्रयत्न करावेत. भारतात जैवज्ञान प्रगतीच्या आड येणाऱ्या अडचणींचे निराकरणासाठी मंडळाने केंद्र शासनाशी संपर्क ठेवावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार नावाने

(आ.बा.कांबळे)
शासनाचे सह सचिव

प्रति,

मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मुंबई
मा. मुख्यमंत्री
मा. उपमुख्यमंत्री
मा. मंत्री (सर्व)
मा. राज्यमंत्री (सर्व)
मुख्य सचिव
सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव
विशेष आयुक्त व प्रधान सचिव, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली
मंत्रालयीन विभाग (सर्व)
विभागीय आयुक्त (सर्व)
महानगरपालिका आयुक्त (सर्व)
जिल्हाधिकारी (सर्व)
मंडळाचे सर्व सदस्य
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, मुंबई
विकास आयुक्त (उद्योग),मुंबई
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
आयुक्त, अन्न व औषधी द्रव्ये प्रशासन, मुंबई
आयुक्त, कृषि, पुणे

एच-402(300-6-02)1अ